**मा. उच्च न्यायालयाच्या नागपूर खंडपीठ येथील मुख्य इमारती दुरूस्तीच्या कामास प्रशासकीय मान्यता देणेबाबत.**

# महाराष्ट्र शासन

**विधी व न्याय विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः एचसीटी-५२२५/ प्र.क्र. ४५/का.४**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
तारीख: १५ एप्रिल, २०२५.

**संदर्भ :** (१) प्रबंधक (निरीक्षणे-२), अपील शाखा, उच्च न्यायालय, मुंबई यांचे पत्र क्र. B (W) ६०४६ of २०२४/(१०४)/५७१/११८४६, दि. ०७/०३/२०२५.
(२) वित्त विभाग, शासन निर्णय विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/१३/विनियम (भाग-२), दि.२०.०९.२०१९.

**प्रस्तावना :-**

मा. उच्च न्यायालयाच्या नागपूर खंडपीठ येथील मुख्य इमारतीमधील लाइम प्लास्टरची आतील बाजूने करावयाची दुरूस्ती यासंबंधित कामास व त्याबाबतच्या अंदाजपत्रकीय खर्चास (सेंटेज चार्जेस वगळून) प्रशासकीय मान्यता प्रदान करण्याचा प्रस्ताव उच्च न्यायालय प्रशासनाने त्यांच्या संदर्भ क्र. १ येथील दि. ०७/०३/२०२५ रोजीच्या पत्रान्वये शासनास सादर केला आहे. सदर प्रस्तावानुषंगाने रु. ७,४८,५२,०००/- इतक्या रक्कमेचे अंदाजपत्रक सार्वजनिक बांधकाम विभागाने सादर केले आहे. सदर अंदाजपत्रकास मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, नागपूर यांनी तांत्रिक मान्यता दिलेली आहे. सदर कामास व त्याबाबतच्या अंदाजपत्रकीय खर्चास मा. उच्च न्यायालयाच्या इमारत समितीची मान्यता प्राप्त आहे. मा. उच्च न्यायालयाच्या सदर प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

मा. उच्च न्यायालयाच्या नागपूर खंडपीठ येथील मुख्य इमारतीमधील लाइम प्लास्टरची आतील बाजूने करावयाची दुरूस्ती यासंबंधित कामे करण्याकरिता येणाऱ्या **रु. ७,२६,२८,०६१/- (अक्षरी रुपये सात कोटी सव्वीस लक्ष अठ्ठावीस हजार एकसष्ठ फक्त) (सेंटेज चार्जेस वगळून)** इतक्या रकमेच्या अंदाजपत्रकास याद्वारे प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

२. उपरोक्त मान्यता प्राप्त अंदाजपत्रकीय रकमेचा तपशिल पुढीलप्रमाणे आहे :-

<u>Name of Work</u> :- Stage-I Estimate For Repair Of Lime Plaster From Inner Side At Hon. High Court Main Building, Civil Lines, Nagpur.

| Sr. No. | Work Detail | Amount |
|---|---|---|
| 1 | Stage-I Estimate For Repair Of Lime Plaster From Inner Side At Hon. High Court Main Building, Civil Lines, Nagpur | Rs. 5,05,79,063.64/- |
| | Total | Rs. 5,05,79,063.64/- |
| 2 | Contingency @ ४% | Rs. 20,23,163/- |
| 3 | Green Building Concept १०% | Rs. 50,57,906/- |
| 4 | Price Escalation १०% | Rs. 50,57,906/- |
| 5 | GST १८% | Rs. 91,04,231/- |

| | | |
|---|---|---|
| 6 | Architectural Services ४% | Rs. 3,00,000/- |
| 7 | Insuarance १% | Rs. 5,05,791/- |
| | Grand Total | Rs. **7,26,28,061/-** |

३. प्रचलित कार्यपद्धतीचा अवलंब करुन ई-निविदा प्रक्रिया सार्वजनिक बांधकाम विभागाकडून राबविण्यात यावी व या प्रशासकीय मान्यतेच्या अनुषंगाने इतर अनुषंगिक कार्यवाही पूर्ण करावी.

४. सदर कामाची निविदा काढताना प्रत्येक कामाची स्वतंत्रपणे निविदा न काढता नमूद सर्व कामांसाठी एकच निविदा काढण्यात यावी.

५. काम सुरू करण्यापूवी सर्व संबंधित स्थानिक संस्था / प्राधिकरणे यांची मान्यता घेण्यात यावी.

६. सदर कामाकरिता सुधारित प्रशासकीय मान्यतेची आवश्यकता लागणार नाही, या दृष्टीने विशेष दक्षता घेण्यात यावी. तसेच अंदाजपत्रकीय कामात बदल होणार नाही याची दक्षता घ्यावी.

७. याप्रित्यर्थ होणारा खर्च "मागणी क्र. जे-१, २०१४ - न्यायदान, (भारित) १०२-उच्च न्यायालये, (०३) (०१) प्रबंधक, अपील शाखा (२०१४ ००९२) (अनिवार्य) अंतर्गत २७ लहान बांधकामे" या लेखाशिर्षाखाली संबंधित वित्तीय वर्षात मंजूर अर्थसंकल्पित निधीतून भागविण्यात यावा.

८. सदर शासन निर्णय हा वित्त विभाग शासन निर्णय विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/१३/ विनियम (भाग-२), दि.२०.०९.२०१९ अन्वये वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८, भाग-पहिला, उपविभाग-पाच, महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियमपुस्तिका परिच्छेद क्र. १३४(३) अन्वये प्रशासनिक विभागास प्रदान करण्यात आलेल्या प्राधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

९. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०४१५१५१२५३०३१२ असा आहे. सदर शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VILAS VASANT GAIKWAD

Digitally signed by VILAS VASANT GAIKWAD
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=LAW AND JUDICIARY DEPARTMENT, 2.5.4.20=64f5ab9e019c90ad5db684984df113ed09062245cb9e042be5b12e5aa482fc17, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=CD7BB8BAA2D72280DD453A12422482D4768A126C83ECB44E84A8186EED4352A0, cn=VILAS VASANT GAIKWAD
Date: 2025.04.15 15:16:45 +05'30'

**( विलास व. गायकवाड )**
**विधि सल्लागार-नि-सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

मा. मुख्यमंत्री तथा मंत्री (विधि व न्याय )यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई, (ई-ऑफीसव्दारे)
महाप्रबंधक, उच्च न्यायालय, मुंबई (ई मेलव्दारे).
प्रबंधक (निरीक्षणे-२) , अपील शाखा, उच्च न्यायालय, मुंबई .
प्रबंधक (प्रशासन), मुंबई उच्च न्यायालय, खंडपीठ नागपूर, नागपूर.
महालेखापाल (लेखापरीक्षा/लेखा अनुज्ञेयता), महाराष्ट्र -दोन, नागपूर.
वरीष्ठ कोषागार अधिकारी, नागपूर.
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, नागपूर.
वित्त विभाग (व्यय-५), मंत्रालय, मुंबई
विधि व न्याय विभाग (का-२३/२४), मंत्रालय, मुंबई
निवड नस्ती.